March 1992 Phalgun 1913



मूल्य : रु. १८.००

प्रकाशक, प्रकाशन विभाग, माहिती आणि नभोवाणी मंत्रालय, भारत सरकार,
पटियाला हाऊस, नवी दिल्ली-१
मुखपृष्ठ - रेखाटने - हर्षा शाह, स्वाती जोशी.

प्रकाशन विभाग ● विक्री केन्द्र

- सुपर बझार, कॅनॉट सर्कस, नवी दिल्ली-११० ००१.
- कॉमर्स हाऊस, करीमभॉय रोड, बेलार्ड पिअर, मुंबई-४०० ०३८.
- ८, एस्प्लनेड ईस्ट, कलकत्ता-७०० ००१.
- एल. एल. ए. ऑडिटोरियम, ७३६, अण्णामलाई, मद्रास-६०० ००२.
- बिहार स्टेट को ऑपरेटिव्ह बँक बिल्डिंग, अलोक राजपथ, पटणा-८०० ००४.
- प्रेस रोड, त्रिवेंद्रम-६९५ ००१.
- १०-बी, स्टेशन रोड, लखनौ-२२६ ००४.
- स्टेट अर्चालॉजिकल म्युझिअम बिल्डिंग, पब्लिक गार्डन, हैदराबाद-५०० ००४.

मुद्रक : मॉडर्न आर्टस अँड इंडस्ट्रिज, १५१ ए टू झेड इंडस्ट्रियल इस्टेट, मुंबई-४०० ०१३.

# प्रकाशकीय

बालकुमारांच्या हाती ख्यातनाम लेखक श्री. अनंत भावे यांच्या कथांचा खजिना देताना आम्हाला आनंद होत आहे. श्री. भावे यांची तुमच्याशी मासिकांतून केव्हाच गट्टी जमली आहे. त्यांचा मी अधिक परिचय तो काय देणार.

भारत सरकारच्या माहिती आणि प्रसारण खात्याच्या प्रकाशन विभागातर्फे मुलांसाठी विविध भाषांमधे काही पुस्तकं प्रसिद्ध करण्याचं ठरविण्यात आलं. फारच कमी दिवसांत हे काम पूर्ण करायचं होतं. मराठी पुस्तकांच्या संपादनाची जबाबदारी आमच्या योजनेचे संपादक श्री नीतीन केळकर यांच्यावर सोपवली होती. त्यांच्या प्रयत्नांमुळेच हे पुस्तक आपल्यापर्यंत पोहोचवणं शक्य झालं. त्यांचेही आभार.

*डॉ. श्यामसिंह शशि*
संचालक

# मुकुटमणीचा गुरुमंत्र

फार फार वर्षापूर्वी आपल्या भारत देशात एक राजा राज्य करीत होता. तो अत्यंत पराक्रमी होता. आपल्या पराक्रमाने त्याने राज्याचा फार मोठा विस्तार केला होता. अनेक मांडलिक राजे त्याला भली मोठी खंडणी देत असत. त्यामुळे त्याचे राज्य ऐश्वर्यसंपन्न झाले होते. त्याच्या कोशागारात अगणित संपत्ती होती. हिरे, माणके, सोने, चांदी यांचा नुसता खच पडला होता पण या साऱ्या संपत्तीत सर्वाधिक मौल्यवान जर कोणती एक वस्तू असेल तर ती नटराजाची मूर्ती. मूर्ती अत्यंत नाजूक होती. तिच्यावर जडावाचे अप्रतिम काम केले होते. कोणत्या पदार्थापासून ती बनवलेली आहे हे कळणे जरा कठीण होते. जडावकामामुळेच ती मूर्ती मौल्यवान होती असे नव्हे तर ऐतिहासिकदृष्ट्यादेखील तिचे मोल फार होते.

हजार वर्षांपूर्वीच्या कोणा अज्ञात कारागिराने ती मूर्ती बनवली होती आणि त्या राजघराण्यात पूजामूर्ती म्हणून परंपरेने ती राहिली होती. आपल्या राजवंशाच्या वाढत्या वैभवाचा आणि या मूर्तीच्या अस्तित्वाचा काही संबंध असला पाहिजे अशी या वंशातील राजांची श्रद्धा होती.

हजार वर्षांपूर्वी त्या कारागिराने ती मूर्ती घडवली आणि आपले कसब आपल्यापाशीच ठेवून तो मृत्यू पावला होता. त्या अद्वितीय मूर्तीचा लौकिक साऱ्या भारतात नव्हे तर परदेशातही पसरलेला होता. राज्याचे ते एक अनन्यसाधारण भूषण होते. त्यामुळे साहजिकच राजा त्या मूर्तीला अत्यंत जपत असे. मूर्ती कडेकोट पहाऱ्यात, एका भव्य दालनात रत्नखचित आसनावर ठेवली होती. तिच्यातून असे तेज फाकत असे, की वेगळ्या कृत्रिम रोषणाईची आवश्यकताच नव्हती.

एके दिवशी पूजा करताना राजाच्या हातून ती मूर्ती भंग पावली. जमिनीवर पडून तिचे अगदी तुकडे तुकडे झाले. मूर्तीप्रमाणेच राजाचे अंतःकरण शतशः भंग झाले. राज्याची प्रतिष्ठाच जणू त्याच्या हातून छिन्नभिन्न झाली होती. अशुभ विचारांचे त्याच्या अंतःकरणात काहूर उठले. त्याला आधी स्वतःचा आणि मग जगाचा संताप आला. ही मूर्ती जोडून देणारा कारागीर शोधला पाहिजे असे त्याच्या मनाने घेतले. राज्यातील उत्तम उत्तम कसबी मूर्तिकारांना त्याने पाचारण केले.

त्या राज्यात कसबी मूर्तिकारांची फार मोठी परंपरा होती. त्यांचा लौकिक सर्वत्र पसरलेला होता. त्यातील अनेकांनी त्या नटराजमूर्तीसारखी मूर्ती बनविण्याचा महत्त्वाकांक्षी प्रयत्नही केला होता पण त्यात त्यांना कधीही यश आले नव्हते. आता राजाने त्यांना बोलावून फुटलेली नटराज मूर्ती सांधण्याची आज्ञा केली होती. रागाने राजाचा विवेक नष्ट झाला होता. राजवाड्यावर जमलेल्या मूर्तिकारांनी ती मूर्ती सांधणे अशक्य आहे असे नम्रतापूर्वक सांगितले. तरीदेखील राजाने त्यांना ते तुकडे घेऊन जायला भाग पाडले. तो म्हणाला, "वाटेल ते करा. पण ही मूर्ती सांधली गेलीच पाहिजे. आणि सांधल्यावर कधीकाळी ती फुटली होती हे लक्षातसुद्धा येता कामा नये. आणि हे काम तुमच्या हातून पार पडलं नाही तर तुम्हा सर्वांचा शिरच्छेद करण्यात येईल!"

काही मूर्तीकारांनी राजाला समजावण्याचा यत्न केला: पण राजाने त्यांचे म्हणणे ऐकून घेतले नाही. 'मूर्ती सांधून द्या.' अशी राजाज्ञा त्याने त्यांच्या तोंडावर फेकली.

बिचारे कारागीर. राजापुढे ते काय बोलणार ? त्यांनी मूर्तीचे तुकडे गोळा केले आणि जड अंत:करणांनी ते घरी परतले. रात्रभर सारेजण त्या तुकड्यांकडे पाहत बसले होते. त्यांच्यातील अतिकुशल मूर्तिकारांनीसुद्धा ही मूर्ती सांधण्यास आपण असमर्थ आहोत असे सांगितले.

शेवटी त्यांच्यापैकी एक वृद्ध, शहाणा मूर्तिकार म्हणाला, "मित्रांनो दु:ख करून काहीही होणार नाही. महाराजांची आज्ञा अंमलात आली नाही तर काय होईल ते आपण जाणता. माझ्या मनात एक कल्पना आली आहे. तुम्ही मुकुटमणीचं नाव ऐकलं असेलच. आपल्या राज्यातला तो सर्वोत्कृष्ट मूर्तिकार आहे. अर्थात आत्यंतिक वार्धक्यामुळं आता मूर्ती घडवीत नाही तो. वज्रपाषाण पर्वतावर एकटाच राहतो तो. असं म्हणतात की, आकाशाकडे पाहत तो स्वस्थ बसलेला असतो. मुकुटमणीचं वय किती आहे ते कोणालाच माहीत नाही. त्याचा पणतू नारायण तुम्हाला ठाऊक असेल. नारायणानं आपल्या पणजोबांकडून त्यांचं कसब हस्तगत करण्याचा कितीतरी प्रयत्न केला. पण त्यांनी ते कसब आपल्याच हाती ठेवलं आहे. असं असलं, तरी कदाचित आपल्यावर कोसळलेल्या अरिष्टाचं निवारण करण्यासाठी मुकुटमणी देईलसुद्धा ही मूर्ती सांधून. आपल्या आशेला तो तेवढाच आधार आहे."

त्या वृद्ध मूर्तिकाराची सूचना स्वीकारण्यावाचून गत्यंतर नव्हते. त्यानंतर त्यांच्यापैकी काही अनुभवी वृद्ध मूर्तिकार मुकुटमणीकडे गेले. घडलेली सारी हकीकत मुकुटमणीला सांगून त्यांनी मूर्तीचे तुकडे त्याच्या पुढे पसरले आणि ते सांधण्याची विनंती केली.

मुकुटमणीने मान हलवली. तो पुटपुटला, "नाही. हे काम माझ्यानं होणार नाही."

आता सर्वांचा मृत्यू अटळ होता. भीतीने सगळे मूर्तिकार रडू लागले. त्यांनी एकच आक्रोश केला.

आपल्या बांधवांचा हा आक्रोश मुकुटमणीला पाहवेना. त्याच्या वृद्ध, वाकलेल्या, सुरकुतलेल्या शरीरात अचानक कसल्यातरी चैतन्याची लहर उसळली. आपल्या कुशल पूर्वजांचे स्मरण त्याला झाले. त्याची बोटे मूर्ती घडवण्यासाठी आतुर झाली. व्यवसायबंधूंना प्राणसंकटातून मुक्त करून आपल्या दीर्घ जीवितकथेचा पूर्णविराम करावा असे त्याला वाटू लागले. तो म्हणाला, "मित्रहो, मी तुम्हांला असं मरू देणार नाही. राजाकडे जाऊन आपण एक वर्षाची मुदत मागून घ्या. या अवधीत मी आपलं काम करण्याचा प्रयत्न करतो."

राजाने मुदत दिली, पण वर्षभरात जर नटराजमूर्ती सांधली गेली नाही तर प्रथम मुकुटमणीचे आणि नंतर इतर सर्व मूर्तिकारांचे मस्तक उडविण्यात येईल असे सांगितले.

मुकुटमणीच्या कामाला सुरुवात झाली. आपला एकान्तवास त्याने अधिक कडक केला. कोणीही भेटायला येता काम नये असा सक्त नियम त्याने केला होता. नारायण आणि त्याची बहीण यांना मात्र अपवाद म्हणून कधी कधी भेट घेण्याची मुभा होती.

वर्ष संपत आले. अखेर शेवटचा दिवस उजाडला. राजाला वाटत होते मूर्ती सांधली जाणार नाही. म्हणून त्याने शिक्षेची अंमलबजावणी करण्याची तयारीही केली. सगळे मूर्तिकार राजवाड्यावर जमले. मुकुटमणीचा पत्ता नव्हता. बरे, त्याला बोलावणार तरी कसे? कारण आठ दिवसांपासून तो बेपत्ता झाला होता! आता सूर्य अस्ताला जाणार आणि मूर्तिकारांच्या आयुष्याची घटका भरणार; इतक्यात दुरून येणाऱ्या मुकुटमणीचे दर्शन सर्वांना झाले. मुकुटमणीच्या हातात कसलेतरी गाठोडे होते. ते घेऊन तो राजापुढे उभा ठाकला. आपल्या थरथरत्या हातांनी त्याने ते गाठोडे सोडले. आणि काय आश्चर्य! ती नटराजमूर्ती खरोखरीच सांधली गेली होती. कधी काळी ती छिन्न भिन्न झाली होती हे लक्षातच येत नव्हते. राजाने अगदी पुनः पुन्हा ती मूर्ती न्याहाळून पाहिली, पण त्याला कोठेही दोष आढळला नाही. त्याला विलक्षण आनंद झाला. मुकुटमणीला त्याने मोठे इनाम देऊ केले. परंतु मुकुटमणीने ते स्वीकारले नाही. तो आपला पुन्हा वज्रपाषाण पर्वतावर चालता झाला.

मुकुटमणीच्या या अद्‌भुत कौशल्याची वार्ता दाही दिशांना पसरली. त्याशिवाय लोकांना बोलायला दुसरा विषय नव्हता. त्याचे कौतुक करताना नकळतपणे एक खिन्नतेचा सूर त्यात उमटून जाई. ते म्हणत : ज्यानं हजार वर्षांपूर्वी घडलेली नटराजमूर्ती सांधली त्याचं कसब लवकरच त्याच्याबरोबरच नाहीसं होणार. दुनियेतला सगळ्यांत मोठा मूर्तिकार खंडित झालेली परंपरा पूर्ववत करून नामशेष होणार.

मुकुटमणीकडून ते कसब शिकावे असे काही मूर्तिकारांच्या मनात आले. ते मुकुटमणीकडे गेले आणि आम्हांला तुमच्या कौशल्याचे रहस्य सांगा अशी त्यांनी त्याची विनवणी केली.

मुकुटमणीने त्यांचे म्हणणे ऐकून घेतले. मग किती तरी वेळ तो आपल्या पांढऱ्या शुभ्र दाढीवरून हात फिरवीत राहिला. मग तो म्हणाला, ''मित्रहो, खरं सांगायचं तर माझ्यापाशी कसलंच रहस्य नाही. तुमच्यासारखाच मी. पण लहानपणापासूनच मला माझं मूर्ती घडवण्याचं काम अत्यंत आवडतं. मूर्तीचं सोडा. एखादा घडा घडवतानादेखील मी त्यात रमून जातो. आपल्या कामात रंगून जाणं याला 'रहस्य' म्हणायचं असेल तर म्हणा हवं तर. पण ते तुम्हांलाही सहज अवगत होऊ शकेल.''

साऱ्या मूर्तिकारांची घोर निराशा झाली. मुकुटमणीकडून काहीतरी वेगळे, अद्‌भुत, नवलाईचे ऐकायला मिळेल असे त्यांना वाटले होते. आणि तो तर सांगत होता, 'हाती घेतलेल्या कामात रंगून जाण्यापलीकडे ते काम सुंदर होण्याच्या बाबतीत दुसरं रहस्य नाही!' त्यांना वाटले, आपल्याला रहस्य कळू नये म्हणून मुकुटमणीने उडवाउडव केली. कसले तरी उत्तर आपल्या उत्सुक कानांवर फेकले आणि एखाद्या कंजूष धनाढ्याप्रमाणे स्वत:चे कौशल्य अट्टाहासाने स्वत:पाशीच ठेवले.

कारागिरांचे सोडा. खुद्द नारायणालादेखील तसेच वाटले. तो एकटाच पणजोबांकडे जाऊन म्हणाला. ''माझ्यावर अनुग्रह करा. मी आणि माझी बहीण यांच्यापलीकडं नात्याचं आपलं माणूस कोणीही नाही. आपली आज्ञा मी कधीही उल्लंघिलेली नाही. आपल्या हातातले अप्रतिम कसब आपण मला तरी शिकवाल काय ?''

मुकुटमणी गप्पच राहिला. त्याने नारायणाकडे बराच वेळ एकटक पाहिले आणि तो तेथून निघून गेला.

एके दिवशी नारायणाच्या बहिणीने त्याला म्हटले, ''पणजोबांचं एक गुपित मला ठाऊक झालं आहे. काल त्यांना भेटण्यासाठी म्हणून डोंगरावर गेले असता पणजोबा गुहेत बसून एका गाठोड्यातल्या कसल्यातरी तुकड्यांकडे पाहत बसले होते. मला नक्की वाटतं की त्यांच्या कौशल्याचं रहस्य त्या गाठोड्यात आहे.''

त्यानंतर संधी साधून नारायणाने मुकुटमणी गुहेत नाही असे पाहून त्या गाठोड्याचा शोध केला. फारसा शोध त्याला करावा लागला नाही. गाठोडे मिळवून मोठ्या अधीरतेने त्याने सोडून पाहिले. आणि त्याला आश्चर्याचा धक्का बसला. राजाच्या नटराजमूर्तीचे तुकडे होते त्या गाठोड्यात!

म्हणजे, मुकुटमणीने फुटकी मूर्ती सांधली नाही तर! मग! अरे बापरे, नवी मूर्ती घडवली असणार त्यांनर. हजार वर्षांपूर्वीच्या मूर्तिकाराने घडवली होती तशीच. अनेकांना प्रयत्न करून जे जमले नव्हते ते वृद्ध मुकुटमणीने करून दाखवले होते. मूर्तिकलेतील चमत्कारच म्हटले पाहिजे याला. ही वार्ता जर सर्वांना कळली तर पणजोबांची केवढी ख्याती होईल! पण ते मात्र याबद्दल चकार शब्दसुद्धा काढत नाहीत. कारण आपली पुरातन मूर्ती सांधली गेली नाही हे राजाला कळले तर सगळ्या मूर्तिकारांचे मरणच

ओढवेल. केवढी परोपकारबुद्धी! केवढा स्वार्थत्याग आणि केवढे अद्भुत कसब! नारायणाच्या मनात उसळून आला. त्यांनी सांगितलेल्या कौशल्यरहस्याचा अर्थ त्याला आता उमगला.

धावत जाऊन नारायणाने पणजोबांना मिठी मारली. मुकुटमणीने नारायणाला पोटाशी घट्ट धरले. भारावलेल्या आवाजात मुकुटमणी म्हणाला, ''औक्षवंत हो बाळ! जोपर्यंत तू आपल्या कामावर प्रेम करशील, त्यात रंगून जाशील तोपर्यंत माझी खात्री आहे माझ्यापेक्षा सहस्रपटींनीसुद्धा तुझं काम चांगलं होऊ शकेल.''

मुकुटमणीचा गुरुमंत्र शाश्वत खरा ठरणार आहे!



# गौतमबुद्ध आणि दगडी माकड

फार फार वर्षांपूर्वीची गोष्ट आहे ही. एका महान पर्वताच्या शिखरावर एक अंड्याच्या आकाराचा दगड तोल साधून राहिला होता. ते दृश्य मोठे चमत्कारिक दिसत असे; आणि त्यामुळे पाहणाऱ्याच्या मनात नकळत एक सुक्ष्म भीती उत्पन्न होत असे.

एके दिवशी ते दगडाचे अंडे फुटले. त्याची दगडी कवचे त्या शिखरावरून प्रचंड आघात करीत खाली कोकसळली आणि त्यांतून एक दगडी माकड जन्माला आले. त्याचे पितृत्व एक क्षुद्र देवाकडे होते. आपल्या विक्षिप्त आणि अनहितकारी इच्छेलाच जणू त्याने दगडी माकडाचे रूप दिले होते. त्या माकडात अहंकारीपणा आणि खोडकरपणा भरपूर प्रमाणात ठेवायला तो देव विसरला नव्हता. त्यामुळे ते दगडी माकड इतर माकडांना आणि माणसांना, इतकेच नव्हे तर भू-जल-अवकाश देवतांनाही चांगला यथेच्छ त्रास देईल, असा विश्वास त्याला वाटत होता.

त्याचा हा विश्वास अनाठायी नव्हता. जन्मदात्याबरोबर ते दगडी माकड शिखरावरून वेड्यावाकड्या उड्या मारीत पर्वतीपायथ्याशी आले. त्याच्या एकेका उडीत एवढे अंतर काटले जात होते की ते पाहून बाकीच्या साध्या माकडांनी आश्चर्याने तोंडात बोटे घातले. 'हा कोण संप्रती नवा मर्कटावतार' अशा आदरयुक्त भावनेने ती माकडे दगडी माकडाकडे पाहू लागली, आणि आपल्या बडबड्या स्वभावानुसार त्याच्याविषयी बोलू लागली.

"हा कोठून आला असेल?"

"हा इथं कसा आला?"

"कशासाठी आलाय हा इथं?"

"आपला आणि याचा संबंध काय?"

आश्चर्य थाडेसे ओसरल्यावर त्यांच्यापैकी एकाने कल्पना सुचवली. "हा आपला महाबांधव दगडी

असला तरी मोठा कर्तृत्वशाली दिसतो. सर्वशक्तिमान अशा या पाषाणदेही मर्कटाला आपण आपला राजा का मानू नये ?''

त्या दगडी माकडाच्या अचाट सामर्थ्याची सर्वांना इतकी खात्री पटली होती की त्यांनी ही कल्पना उचलून धरली. मग विधिपूर्वक त्याची राजा म्हणून निवड करावी असे त्यांनी ठरवले. यासंबंधी दगडी माकडाशी बोलणी करण्याकरिता त्यांनी त्या कल्पक माकडाची योजना केली.

आपल्या कल्पनेबद्दल पूर्ण विश्वास असलेले आणि इतरांच्याही विश्वासाला पात्र झालेले ते माकड त्या मर्कटराजाजवळ जाऊन अदबीने म्हणाले, ''हे पाषाणखंडोत्थित महामर्कटा, आम्ही सगळी क्षुद्र माकडं आपल्या सामर्थ्यातिशयानं चकित होत्साती आपल्या चरणांशी आलो आहो. आपण आमचे महाराजाधिराज खचित शोभाल. तरी आपण हे महाराजापद ग्रहण करावं अशी आम्हा सर्वांची आपल्यापाशी नम्र व कळकळीची प्रार्थना आहे.''

त्या माकडांचे ते आदरपूर्ण भाषण ऐकल्यावर दगडी माकडाच्या चेहऱ्यावर समाधान विलसू लागले. पण कोणत्याही विनंतीला तत्काळ होकार देणे हे मोठेपणाशी सर्वस्वी विसंगत आहे, हे वेळीच ध्यानात आल्यामुळे त्याने हे समाधान चेहऱ्याआड दडवले आणि विनवण्या व नकार यांची दुपक्षी अनेकविध आवर्तने झाल्यावर मोठ्या कष्टी व परोपकारी चेहऱ्याने पण तुष्ट मनाने त्याने माकडांचे राजेपद ग्रहण केले.

काही काळ मोठ्या दिमाखात राज्य केल्यावर एके दिवशी दगडी राजाने आपल्या प्रजाजनांना म्हटले, ''काही दिवसांपूर्वी मी आपलं राजेपद स्वीकारलं. त्यानंतर हे राज्य किती उत्तम चाललं आहे याची आपल्याला कल्पना आहेच. पण मला अलीकडे असं वाटू लागलं आहे की आपल्याला बुद्धीची-शहाणपणाची थोडी गरज आहे. अर्थात बुद्धी बाहेरून आणणे ही गोष्ट, मी आपला राजा असताना फारशी कठीण नाही. पण त्याकरिता मला विश्वाच्या दुसऱ्या टोकाला असलेल्या एका जादूगाराकडे जावं लागेल. आपल्या कल्याणासाठी तिकडे जाण्याचा निर्णय मी घेतला आहे!''

राजेसाहेबांचे हे कनवाळूपणाचे भाषण ऐकून सर्व प्रजाजनांचा राजेसाहेबांबद्दलचा आदर वृद्धिंगत झाला. त्यांनी राजाच्या निर्णयाला हार्दिक पाठिंबा दिला.

अनेक दिवस प्रवास केल्यानंतर तो विश्वाच्या दुसऱ्या टोकाला आला. तेथे एका गुहेत जादूगार कसल्या कसल्या विचित्र औषधांची भयानक रसायने बनवण्यात मग्न होता. गुहेच्या तोंडाशी एक भलामोठा दगड दरवाजाचे काम करीत होता. माकडाने तो दगड एकदा-दोनदा-तीनदा ठोठावला. तिसऱ्या वेळी गुहेतून जादूगाराने चिडक्या आवाजात विचारले, ''कोण आहे?''

"मी . . . माकडांचा दगडी राजा!" दगडी माकडाने उत्तर दिले.

"मग तो दगड बाजूला सारून आत ये. मी कामात आहे आत्ता." जादूगाराने सांगितले.

दगडी माकडाने पुष्कळ प्रयत्न केला, परंतु तो दगड रेसभरदेखील हलला नाही. शेवटी निराशेने तो म्हणाला, "मला नाही सरकवता येत तो दगड."

"मग राहा बाहेरच उभा." असे म्हणून जादूगार आपल्या कामात गढून गेला.

वर्षामागून वर्षे गेली. गुहेच्या बाहेर थांबलेल्या दगडी माकडाने अनेक वेळा तो दगड ठोठावाल, पण आतून आवाज आला नाही.

शेवटी एके दिवशी जादूगारानेच तो दगड बाजूला करून दाराशी तिष्ठत असलेल्या दगडी माकडाला आत घेतले. आतील दृश्य पाहून नाही म्हटले तरी त्या दगडी माकडाला थोडे भय वाटले. गुहेत सगळीकडे वेगवेगळ्या प्रकारच्या भयानक आकाराच्या वनस्पती टांगून ठेवल्या होत्या. पशूंचे आणि माणसांचे सांगाडे जागोजाग उभे होते. ठिकठिकाणी चित्रविचित्र आकाराच्या कढयांमधून उग्र वासाचे रस उकळत होते. आणि आता त्या जादूगाराचे तीन पिवळेजर्द डोळे त्याच्यावर खिळले होते!

"जादूगारमहाराज, आपल्याकडून थोडी जादू शिकावी, मोठं सामर्थ्य प्राप्त करावं यासाठी मी आलो आहे" दगडी माकडाने बोलायला सुरुवात केली.

"बुद्धी आणण्याचा बहाणा करून तू जादू शिकण्यासाठी आलास हे मी कधीच ओळखलं होतं." जादूगार आपल्या भेसूर आवाजात बोलू लागला, "परंतु तू इतकी वर्षं दाराशी थांबलास तेव्हा तुला काही जादू शिकवलीच पाहिजे मला. पण एक गोष्ट लक्षात ठेव. त्या जादूनं तुला तुझी एकच मागणी पुरी करता येईल. आहे कबूल?"

"होय महाराज, आहे कबूल." असे म्हणून दगडी माकडाने आपण कोणती एक गोष्ट मागावी याचा विचार करायला सुरुवात केली. पुष्कळ वेळ विचार केल्यावर, आणि अनेक गोष्टी रद्द केल्यावर त्याने जादूगाराकडे एक गोष्ट मागितली, "जादूगारमहाराज, आजवर कोणी मारली नसेल इतकी लांब उडी मारण्याचं सामर्थ्य जादूनं आपण मला द्या!"

जादूगाराने विकट हास्य केले आणि एका कढईतील उकळता रस माकडाला प्यायला दिला. नंतर त्याने त्याला लांब उडी मारण्याचा मंत्र शिकवला. माकड संतुष्ट झाले. गुहेच्या बाहेर आल्यावर प्राप्त झालेल्या सामर्थ्याची थोडीशी चाचणी घेण्याकरिता माकडाने अर्धवट मंत्र म्हणून उड्डाण केले. दुसऱ्या क्षणी तो दुसऱ्या टोकाला असलेल्या त्याच्या राज्यात आला. ताबडतोब सगळी माकडे त्याच्याभोवती

गोळा झाली. आश्चर्यचकित होऊन ते त्याच्याकडे पाहतच राहिले. आपल्या अचाट सामर्थ्याचे प्रात्यक्षिक प्रजाजनांना दाखवावे या हेतूने त्याने आकाशात उंच उड्डाण केले आणि अल्पावकाशात तो आकाशगतील आपल्या राजमहालात स्थानापन्न झालेल्या महात्मा गौतमबुद्धांच्या समोर उभा ठाकला.

बुद्धदेवांना अंतर्ज्ञानाने या दगडी माकडाची सगळी कहाणी तत्काळ माहीत झाली. त्याचे गर्वहरण करावे, असाही विचार त्यांच्या मनात आला.

त्यांनी माकडाला विचारले, ''काय ? तुझं चांगलं चाललं आहे ना ?''

माकड म्हणाले, ''कसचं महाराज ? अहो, त्या पृथ्वीवर माझ्याइतकी लांब उडी कोणाला मारताच येत नाही. मग विचार केला की आकाशात जावं आणि बुद्धदेवांवरच मात करावी. काय, कशी काय आहे माझी कल्पना ?''

''कल्पना चांगली आहे.'' बुद्धदेव म्हणाले, ''आपण अशी योजना ठरवू. माझ्या तळहातावर तू उभा राहा. या हातापलीकडे जर तू उडी मारू शकलास तर आकाशाचं राज्य मी तुला देईन; पण जर ते तुला जमलं नाही तर तुला पुन्हा पृथ्वीवर जाऊन दगडी माकड होऊन राहावं लागेल. आहे कबूल ?''

बुद्धदेवांच्या दर्पोक्तीचे माकडाला हसू आले. जो मी अनेक योजने लांब उडी मारतो, जो मी आकाशात उड्डाण करू शकतो, तो मी बुद्धदेवांच्या इवल्याशा तळहातापलीकडे उडी मारू शकणार नाही काय ? असा विचार करून माकड बुद्धदेवांना जिंकण्याच्या ईर्ष्येने त्या कृत्याला प्रवृत्त झाले.

बुद्धदेवांनी आपला पंजा पसरला. माकड त्यावर उभे राहिले. मंत्र म्हणून सर्व शक्ती एकवटून त्याने लांब उडी मारली. इतकी लांब की काही काळ त्याला काही दिसेना. शेवटी कितीतरी वेळाने अचानक अंतराळात त्याला पाच लालसर रंगाचे खांब उभे असलेले दिसले. त्यांच्या पलीकडे जाता येईल असे त्याला वाटेना. 'हरकत नाही. तळहातापासून किती दूरवर आपण उडी मारली हे दाखवण्यासाठी यांपैकी एका खांबावर आपले नाव लिहावे हे बरे; म्हणजे उगाच संशयाला जागा नको.' माकड मनात म्हणाले आणि त्याने मधल्या खांबावर आपले नाव लिहिले. आपल्या शहाणपणावर तो भलताच खुश झाला. इतक्यात त्याच्या कानांवर बुद्धदेवांचा आवाज पडला. बुद्धदेव त्याला म्हणत होते, ''हे दगडी मर्कटा, एवढी वल्गना केलीस तू. आता बघू तळहातापलीकडे किती दूरवर उडी मारतोस तू ते.''

''पण मी मारली उडी.'' माकड संतापून म्हणाले, ''खूपच लांब मारली. मला वाटलंच होतं तुम्ही काहीतरी खुसपट काढाल म्हणून. म्हणून मी जेथपर्यंत उडी मारली तिथं माझं नावच लिहून टाकलं एका खांबावर !''

"खांबावर ?"

"होय. अंतराळात दूर एके ठिकाणी पाच खांब होते. तेथपर्यंत पोचली माझी उडी. मग मधल्या खांबावर मी माझं नाव लिहून ठेवलं. मला नाही वाटत तुम्हांला तेथपर्यंत जाऊन ते पाहता येईल असं. त्यामुळं कबूल केल्याप्रमाणं आकाशाचं राज्य देऊन टाका मला." माकड विजयोन्मादाने म्हणाले.

बुद्धदेव शांतपणे म्हणाले, "तुझं म्हणणं अगदी योग्य आहे. पण इकडे माझ्या हाताच्या मधल्या बोटावर काय लिहिलं आहे ते पाहिलंस काय ?"

माकडाने बुद्धदेवांच्या हाताच्या मधल्या बोटाच्या आतील बाजूला लिहिलेली अक्षरे वाचली आणि तो भीतीने व संतापाने किंचाळू लागला. अंतराळातील मधल्या खांबावर लिहिलेले स्वत:चे नाव बुद्धदेवांच्या मधल्या बोटावर त्याला वाचायला मिळाले होते!

● ● ●

# ठेंगुराव आणि अद्भुत वाटाणे

एका राज्यात एक सरदार राहत होता. आपल्या गुणांमुळे सरदाराने राजाची मर्जी संपादन केली होती. सरदाराला जास्वंदी नावाची एक मुलगी होती. जास्वंदी सुस्वरूप तर होतीच, पण सद्गुणीदेखील होती. त्यामुळे घरीदारी तिचे कौतुकच कौतुक होत असे. पण आश्चर्याची गोष्ट अशी की सर्वसाधारणपणे अशा कौतुकाने मुली बिघडतात तशी जास्वंदी बिघडली नव्हती. हां, तिच्या बाबतीत एक गोष्ट मात्र काळजी करण्यासारखी होती. ती म्हणजे एकदा तिचे मन कशावर गेले की ते प्राप्त केल्याशिवाय तिच्या जिवाला चैन पडत नसे. लहानपणी या गोष्टीचे काही फारसे वाटले नाही: पण आता मोठेपणी मात्र आईवडिलांना तिची चिंता वाटे.

यथाकाल जास्वंदीच्या वडिलांनी तिचे लग्न करायचे ठरविले, आणि ते तिला अनुरूप असा नवरा शोधू लागले. आपल्यासाठी नवरा वडिलांनी शोधावा हे जास्वंदीला रुचण्यासारखे नव्हतेच. त्यामुळे तिने स्वत:देखील आपल्याला आवडणाऱ्या माणसाचा शोध चालवला. गढीवर येणारी माणसे ती बारकाईने न्याहाळू लागली.

एके दिवशी ती आपल्या सज्ज्यात उभी होती. गढीच्या प्रवेशद्वारातून येणाऱ्या एका तरुणाने तिचे लक्ष वेधून घेतले. तो तरुण हाडापेराने चांगला मजबूत होता, त्याचा मूळचा गोरा रंग बहुधा सतत केलेल्या कष्टांमुळे तांबारला होता. त्याचे कपडे जाडेभरडे होते. पर चेहरा कमालीचा हसरा होता. एक प्रकारची बेफिकिरी त्याच्या डोळ्यांत चमकत होती. मजेत शीळ घालत तो गढीत शिरत होता.

जास्वंदीने दासीला हाक मारली आणि त्या तरुणाबद्दलची माहिती विचारली. दासी म्हणाली, "ताईसाहेब, तो तर लोहाराचा मुलगा मणी. गावात दुकान आहे त्याचं. नाल मारायला घोडे घेऊन जायला बोलावलं असणार महाराजांनी त्याला. पण ताईसाहेब तुम्हांला कशाला हवी त्याची माहिती ?"

"सहज अगदी सहज. एक आपली गंमत म्हणून." जास्वंदी म्हणाली, पर त्याच वेळी मणीच्या दुकानात जाऊन त्याला नीट भेटण्याचा निश्चय तिने मनोमन केला होता. मणी तिला भलताच आवडला

होता. श्रीमंत नसेल तो; पण किती तरी उमरावपुत्रांपेक्षा उमदा आणि देखणा होता तो. त्याच्या डोळ्यांतली बेफिकिरी पैशांच्या मागे लागलेल्या धनिकांच्या डोळ्यांत कुठे होती ?

दुसऱ्या दिवशी तिने एका दासीचे कपडे पळविले. ते घालून संध्याकाळच्या वेळी गुप्त दरवाजाने ती गढीबाहेर पडली. तिला मणीला पाहायचे होते आणि त्याच्याशी बोलायचे होते.

मणीचे दुकान गावापासून काही अंतरावर होते. त्यामुळे त्या रस्त्यावर चिटपाखरूदेखील नव्हते. तिला कोणी पाहील अशी भीती नव्हती. ती दुकानात गेली तेव्हा मणी नालबंदी करीत होता. त्याच्या अंगावरील कपडे धुळीने आणि धुराने काळवंडले होते. अंगा-तोंडाला ठिकठिकाणी काळे लागले होते. घाम आला होता. केस विस्कटले होते. पर जास्वंदीला त्याचे काहीच वाटले नाही. त्याचे लक्ष तिच्याकडे गेल्यावर ती हसली. म्हणाली, ''मी गढीवरून आले. इकडूनच चालले होते. होते. सहज म्हटलं नालबंदी झाली आहे का पाहावं.''

मणी तिच्याकडे पाहतच राहिला होता. इतकी सुंदर मुलगी त्याने अजूनपर्यंत पाहिली नव्हती. गढीवरची असूनही ती आजवर कशी दिसली नाही याचे आश्चर्य तो करीत होता. तिच्याशी संभाषण वाढविण्याकरता तो म्हणाला, ''थांब, एवढी नालबंदी करतो आणि मग घोड्यावरूनच पोचवतो तुला गढीवर.''

''नको नको'' ती म्हणाली, ''मी आपली जाते कशी चालतच. नाहीतर उशीर होईल.'' आणि ती गेलीसुद्धा.

ती गेल्यावर मणीच्या लक्ष्यात आले की तिचे नाव विचारण्याचेसुद्धा तो विसरून गेला होता.

दुसऱ्या दिवशी, नालबंदी करून त्याने घोडा गढीवर आणला. दुकानात आलेली मुलगी कुठे दिसते का हे तो बारकाईने पाहू लागला पण ती त्याला कुठेच दिसली नाही. व्याकुळ होऊन तो परत गेला.

त्यानंतर एके दिवशी, दुकानात काम करीत असताना रस्त्यावर घोड्यांच्या टापांचा आवाज झाला, म्हणून कुतूहलाने मणी दारांत आला. रस्त्यावरून काही घोडेस्वार गढीच्या दिशेने वेगात जात होते. त्यांत सरदाराच्या शेजारच्या घोड्यावर आपल्याला दुकानात भेटलेली ती मुलगी बसली आहेसे त्याला वाटले. नक्की तीच ती. तिला ओळखण्यात चूक कशी होईल त्याच्याकडून ? स्वत:ची खात्री पटावी म्हणून त्याने वडिलांना विचारले,

''दादा, सरदाराच्या शेजारच्या घोड्यावर कोण आहे ती ?''

''अरे ती तर सरदाराची मुलगी - जास्वंदी.''

"जास्वंदी ?" असा आश्चर्योद्‌गार काढून मणी एकदम खिन्न झाला. दुकानात आलेल्या, एकदाच भेटलेल्या त्या मुलीशीच लग्न करण्याचा मणीने निश्चय केला होता. ती मुलगी म्हणजे खुद्द जास्वंदी असेल याची त्याला यत्किंचित कल्पना तरी कशी येणार ? त्याला वाटले, जास्वंदीने आपली चेष्टा केली. तिची चेष्टा झाली पण आपला मात्र जीव जायची पाळी आली.

लवकरच जास्वंदी वडिलांना म्हणाली,

"बाबा, माझ्या नवऱ्याचा शोध नका करू आता. मी स्वत:च शोधलाय तो."

"कोण आहे हा भाग्यशाली तरुण" वडिलांनी कौतुकाने आणि कुतूहलाने विचारले.

"आपल्या लोहाराचा मुलगा मणी !"

"काय लोहाराचा मुलगा-तुझा नवरा ? माझ्या मुलीचं लग्न लोहाराच्या मुलाशी ? अशक्य, त्रिवार अशक्य. प्राण गेला तरी हे लग्न होणार नाही. जास्वंदी, मला वाटतं तुला वेड लागलं आहे. अग, संसार चालवणं म्हणजे भाता चालवण्याइतकं सोपं नाही म्हणावं त्याला !"

"बाबा, तुमच्या सांगण्याचा काही उपयोग होणार नाही. मला मणीशी लग्न करायचं आहे आणि ते मी करणार."

जास्वंदीच्या उद्‌गारांनी वडिलांच्या मस्तकावर जणु घणाघातच झाला. त्यामुळे काही काळ ते सुन्न झाले. नंतर मात्र मुलीच्या आततायी विचाराचा त्यांनी अत्यंत संताप आला. तिचे लग्न प्रधानपुत्राशी लावण्याचा विचार त्यांनी मनाशी पक्का केला होता. मुलीच्या या विक्षिप्त निर्णयामुळे त्यांचा बेत ढासळला, मुलगी भ्रमिष्ट झाली आहे अशी त्यांची खात्री पटली. मणीबद्दल तिला आज आकर्षण उत्पन्न झाले असेल, पण ते कालांतराने तसे राहणार नाही. त्यामुळे थोडा काळ गेल्यावर आपोआप तिची चूक तिला कळेल. यासाठी काही काळ जाऊ देणे, आणि त्या काळात तिची आणि मणीची भेट होऊ न देणे मात्र अत्यावश्यक होते असा विचार करून, वडिलांच्या अधिकारात, त्यांनी जास्वंदीला दूर असलेल्या आपल्या भावाकडे पाठविण्याचे निश्चित केले.

अल्पावधीत त्यांनी सगळी सिद्धता केली. तोपर्यंत त्यांनी तिला अगदी कडेकोट बंदोबस्तात ठेवले होते. सतत कोणाचा ना कोणाचा पहारा तिच्यावर असे, त्यामुळे ती अगदी कावून गेली होती. विचार करायला तिला एकान्त हवा होता. लोहाराच्या मुलाची - मणीची - भेट घेणे अशक्यच होते. पर निदान त्याला बातमी तरी कळवायला हवी होती. पण खरे म्हणजे दुसऱ्या दिवशी होणारी पाठवणीच तिला पसंत नव्हती. ती टाळता येईल, याची युक्ती शोधण्यासाठी एकटेपणा हवा होता तिला.

संध्याकाळी सगळ्यांची नजर चुकवून जास्वंदी गढीच्या मागे असलेल्या बागेत गेली. बाग भलीमोठी होती. शिवाय तिच्या लगतच राखलेले रान होते. जास्वंदीचे पाय नकळत त्या रानाकडे वळले.

रानात फिरत असताना अकस्मात जास्वंदीचा पाय कशाला तरी अडखळला. कोणाचा तरी चढाव होता तो. अगदी छोटा, गर्द शेवाळी रंगाचा. तिने कुतूहलाने तो उचलला. असला चढाव तिने आजवर कोणा मनुष्याच्या पायांत पाहिलाच नव्हता. त्याच्यावरचे नक्षीकाम अद्भुतच होते. चढाव हातात घेऊन ती फिरत होती. एकदम तिला कोणाच्या तरी रडण्याचा आवाज आला. त्वरेने ती आवाजाच्या दिशेने गेली. आणि पाहते तो एका झाडाखाली बसून एक म्हातारा रडत होता. त्याचा पोषाख गर्द शेवाळी रंजाचा होता. उंची होती अवघी तीन फूट. त्याला पाहिल्याबरोबर जास्वंदीला काहीतरी आठवले. ठेंगुराव नावाच्या यक्षांच्या जातीबद्दल तिने पुष्कळ ऐकले होते. हा म्हातारा त्यांच्यापैकीच असावा असे तिला वाटले.

पुढे होऊन जास्वंदीने त्याला विचारले, ''आजोबा, तुम्ही का रडता ? काय झालं ?''

म्हाताऱ्याने वर पाहिले. तो म्हणाला, ''अग पोरी, माझा एक चढावच पडला कुठंतरी या रानात. चढाव नाही म्हणजे ठेंगुरावानं जायचं कसं आपल्या राज्यांत ?''

''अय्या, मला वाटलंच होतं तुम्ही ठेंगुराव असाल म्हणून. माझ्या आजीनं तुमच्याबद्दल किती छान छान गोष्टी सांगितल्या होत्या मला. पण ठेंगुराव तुम्ही अगदी खरेखुरे असाल असं मात्र वाटलं नव्हतं हां मला. मी आपली आजीला म्हणायची, 'असे कसे असतील ठेंगुराव ? आणि भेटतील कसे कोणाला ते ?' पण ती म्हणायची 'असतात.' मग मी म्हणायची, 'असतील.' - आणि आता म्हणते 'आहेत !' - अरे पण मी ही काय बडबड चालू केली. हा बघ. हा आहे का तुमचा हरवलेला चढाव ?'' जास्वंदीने अदबीने विचारले आणि तो चढाव त्याच्यासमोर धरला.

चढाव पाहताच ठेंगुराव खुश झाला. म्हणाला, ''होय हाच माझा चढाव. हा मिळाला नसता तर माझी धडगत नव्हती. मुली, मी तुझा फार फार आभारी आहे. पण तुला कसा मिळाला हा चढाव ? आणि अशी एकटीच, तिन्ही सांजेची या रानात काय करते आहेस ?''

ठेंगुरावाच्या शब्दांतील आपुलकीमुळे जास्वंदीला रडूच फुटले. ठेंगुरावाने तिची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. तो म्हणाला, ''अशी रडू नकोस मुली. तू रडलीस तर मीही रडायला लागेन मघाच्या सारखा. आपण दोघेही भैंऽऽ असे रडत बसू''

ठेंगुरावाच्या बोलण्याची जास्वंदीला गंमत वाटली. नकळतच ती हसू लागली. हसताहसता म्हणाली, ''ठेंगुराव तू फार चांगला आहेस. पण माझे आईबाबा दुष्ट दुष्ट आहेत अगदी,''

''अग, आईवडिलांबद्दल असं बोलू नाही.''

''मग ते तरी असं का करतात ?''

''काय केलं त्यांनी ? मारलं तुला ?''

''नाही.''

''मग ?''

''काही नाही. तो लोहाराचा मुलगा मणी आहे ना, त्याच्याशी लग्न करायचं आहे मला. आणि बाबांना तर ते अगदी पसंत नाही. त्यांनी म्हणे माझं लग्न प्रधानाच्या मुलाशी ठरवलंय. मेलं अगदी बावळट ध्यान आहे. मी नाही त्याच्याशी लग्न करणार.''

''हे जर नक्की असेल तुझं तर तू बेलाशक लोहारच्या मुलाशी लग्न कर. अग, मियाबिबी राजी तो क्या करे पिताजी ?''

''हूंऽ. क्या करे पिताजी म्हणे. आमच्या बाबांना अजून पाहिलं नाही म्हणून म्हणतोस तू असं. अरे, लग्न मोडावं म्हणून ते उद्या मला दूर काकांच्याकडे पाठवून दणार आहेत. मला अगदी वैताग आला आहे. सगळ्यांचा कडक पहारा आहे माझ्यावर. पहारा चुकवून आले बागेत आणि तू भेटलास.''

''नुसता 'भेटलास' नाही - 'देवासारखा भेटलास ' म्हण''.

''म्हणजे ?''

''म्हणजे काही नाही. उद्या तू काकांच्याकडे काही जात नाहीस.''

''खरंच ? खरं सांगतोस तू हे ?''

''ठेंगुराव कधीच खोटं बोलत नसतात. तू मला माझा जोडा दिलास. आता मी तुझा आणि लोहाराच्या मुलाचा जोडा जमवून देतो !''

''पण ते जमणार कसं हो ठेंगुराव ?''

तुला एक गोष्ट करावी लागेल. करशील ?''

''अगदी आनंदानं. ठेंगुराव तू खरंच किती चांगला आहेस !''

ठेंगुरावाने अंगरख्याच्या आतल्या खिशात ठेवलेली एक छोटीशी थैली बाहेर काढली. थैलीतून एक वाटाण्याची शेंग काढून तो जास्वंदीला म्हणाला, ''ही वाटाण्याची शेंग घे, आणि रात्री झोपण्यापूर्वी यातले वाटाणे खाऊन झोपी जा. एवढं केलंस म्हणजे कोणाची बिशाद आहे तुला उद्या काकांकडे पाठवायची !''

ठेंगुरावाने दिलेली ती अद्भुत वाटाण्याची शेंग जास्वंदीने घेतली, त्याचे पुन:पुन्हा आभार मानले

आणि ती गढीकडे वळली. तितक्यात ठेंगुरावाने तिला विचारले, ''एवढं झालं तरी तुझं नाव नाही सांगितलंस मला.''

''असं होय ? मी तरी अशीच वेंधळी आहे. माझं नाव जास्वंदी.''

झोपण्यासाठी रात्री जास्वंदी आपल्या शयनृहात गेली तेव्हा सरदाराने बाहेरून तिच्या दाराला भलेमोठे कुलूप लावले. न जाणो रात्रीची वेळ साधून पोरगी पळून जायची एखाद्या वेळी.

दिवसभराच्या श्रमामुळे जास्वंदी दमली होती. त्याहिपेक्षा तिला ते वाटाणे खायची घाई झाली होती. शेंग फोडून तिने वाटाणे खायला सुरुवात केली, तेव्हा ठेंगुरावावर पुरता विश्वास असूनदेखील नाही म्हटलं तरी तिला थोडी भीती वाटत होती. वाटाणे खाऊन ती झोपी गेली.

सकाळ झाली, एका दासीने जास्वंदीच्या शयनगृहाचे दार उघडले, आणि एकदम एक मोठी किंकाळी फोडून ती बेशुद्ध झाली. किंकाळी ऐकून जास्वंदीचे आईवडील धावत आले. शयनगृहात जास्वंदीचा पत्ता नव्हता. इतक्यात त्यांचे लक्ष तिच्या पलंगावरील छोट्याशा वस्तूकडे गेले. ती वस्तू जिवंत होती. त्यांच्याकडे लुकलुकत्या डोळ्यांनी पाहत होती. जरा जवळ जाऊन पाहिल्यावर त्यांच्या लक्षात आले. ते एक कुत्र्याचे पिलू होते!

सरदार भयंकर संतापला. तो गरजला ''हा काय जादुटोना आहे. फेकून द्या ते कुत्र्याचं पिलू बाहेर. आधी जास्वंदीला शोधा.''

ते कुत्र्याचं पिलू बाहेर भिरकावून देण्यासाठी तो स्वथ: पुढे झाला; पण जास्वंदीच्या आईने त्यांना हटकले. ती म्हणाली, ''मला एक शंका येते. हे कुत्र्याचं पिलू नसून जास्वंदीच असावी आपली. पाहा ना तिच्या सारखेच डोळे आहेत याचे. इतकं होती कशाला, जास्वंदीची मोत्यांची माळसुध्दा आहे याच्या गळ्यात.''

''डोकं फिरलं आहे तुमचं. माणसांची अशी कुत्री व्हायला लागली म्हणजं बघायला नको.'' सरदार तुच्छतेने म्हणाला आणि मंचकाजवळ गेला. त्याने ते पिलू उचलले. पण सरदाराची आणि त्या कुत्र्याची नजरानजर होताच मात्र फेकून देण्याऐवजी त्याने त्याला हृदयाशी घट्ट धरले, जास्वंदीची अवस्था पाहून त्याच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले !

जास्वंदीला भावाकडे पाठवण्याचा बेत अर्थातच रद्द झाला. जास्वंदी फार आजारी आहे अशी बातमी गढीवर पसरवून देऊन तिला भेटण्याची सर्वांना मनाई करण्यात आली. सरदाराने गुप्तपणे काही हकीम, वैद्य, मांत्रिक बोलावले; पण या प्रकारातले कोणालाच काही कळले नाही. सरदाराचा धीर सूटत चालला. एकच गोष्ट म्हटली तर दिलासा देणारी होती. ते कुत्र्याचे पिलू मजेत होते! शयनगृहात ते दिवसरात्र बागडत होते.

सरदाराची व त्याच्या पत्नीची अवस्था मोठी चमत्कारिक झाली होती. नशिबाला बोल लावीत ते कसेतरी दिवस ढकलीत होते.

कशी कौणास ठाऊक, पण जास्वंदीच्या आजाराची वार्ता मणीच्या कानांवर आली, त्याला अत्यंत वाईट वाटले. तिला एकदा डोळे भरून पाहावे असे त्याला वाटत होते. पण ते कसे जमेल ? त्यामुळे तो बिचारा तिच्यासाठी एकटेपणी शोक करीत होता. उगाच कोठेतरी पाहत तो तासचे तास बसून राही. काम करायचा तो आपल्या परीने प्रयत्न करी; पण त्यात त्याचे लक्ष लागत नसे.

एके दिवशी, मध्यरात्र उलटून गेल्यानंतरदेखील तो दुकानात काही बाही काम करीत होता. कामात त्याचे जरासुद्धा लक्ष नव्हते. उगाच इकडे तिकडे ठोकाठोक करीत तो मन गुंतवण्याचा यत्न करीत होता. इतक्यात भिंतीवर कोणाची तरी सावली पडली. मणीने मान वर करून पाहिले. त्याच्यासमोर तीन फूट उंचीचा, गर्द शेवाळी रंगाचा पोषाख घातलेला, चमत्कारिक दिसणारा एक म्हातारा उभा होता. मणीकडे पाहून तो हसला. मणी गोंधळून गेला. म्हाताऱ्याने बोलायला सुरुवात केली, ''माझ्या घोड्याला नालबंदी करायची आहे. करशील का ?''

''हो. अवश्य करतो'' असे म्हणून मणीने त्याचा घोडा कोठे दिसतो का म्हणून आजूबाजूला पाहिले. भिंतीवर मणीला घोड्याची सावली दिसत होती. पण प्रत्यक्ष घोडा मात्र नव्हता. आता तो पुरता भांबावला, नाल घेऊन तो पुढे झाला आणि तो मारण्यासाठी सावलीतल्या घोड्याचा पाय उचलू लागला. ठेंगुराव (वाचकहो, हे मणीला कळले नाही तरी तुम्हाला नक्की कळले असणार.) मोठमोठ्याने हसू लागला.

मणी दचकला. ठेंगुरावकडे दिङ्मूढ होऊन पाहत राहिला.

ठेंगुराव हसतच म्हणाला, ''वा राव, सावलीतल्या घोड्याची नालबंदी चालवली आहे तुम्ही ? मन. ठिकाणावर नाही दिसत तुमचं !''

''खरं आहे. अगदी खरं आहे...'' म्हाताऱ्याला कोणत्या नावाने संबोधावे ते मणीला उमजेना.

''ठेंगुराव -'' ठेंगुरावाने त्याची अडचण दूर केली.

''होय ठेंगुराव, खरं आहे तुम्ही म्हणता ते. मन नाही आमचं ठिकाणावर. पण त्याला काय करणार ?

''असं कसं म्हणतोस तू ? अरे प्रत्येक गोष्टीवर इलाज असतो.''

''या गोष्टीवर इलाज नाही ठेंगुराव.''

''अरे इलाज तुला ठाऊक नाही म्हणजे तो नाहीच असं कसं म्हणता येईल. कदाचित तो मला ठाऊक असेल.''

''ठेंगुराव तुम्ही माझी चेष्टा कर करीत नाही ?''

''सावलीतल्या घोड्याला नालाबंदी करणाऱ्याची ठेंगुराव कधीही चेष्टा करीत नसतात!''

''ठेंगुराव, माझं एका मुलीवर प्रेम आहे. तिच्याशी लग्न करायच आहे मला.''

''मग करून टाका लवकर. लग्न करणं आणि नालबंदी करणं कधी लांबणीवर टाकू नये. एकामुळं घोड्याची आणि दुसऱ्यामुळं माणसाची कठीण अवस्था होते.''

''पण कसं करणार? ती पडली सरदाराची मुलगी आणि मी लोहाराचा मुलगा.''

''म्हणून काय झालं? काय सरदाराची मुलगी झाली म्हणून तिला तीन डोळे आणि पाच कान आहेत होय?''

''पण — ''

''पणबिण काही नाही. अरे वेड्या सरदाराच्या मुलीला-जास्वंदीला-मणी नावाच्या लोहाराच्या मुलाशीच लग्न करायचं आहे. तिनं स्वतःच सांगितलं मला हे.''

''म्हणजे ?''

''आता सगळं सांगत बसत नाही मी. जास्वंदी आजारी आहे ना ? तिला औषध घेऊन जा हे. हे औषध घेतलं म्हणजे ताबडतोब बरी होईल ती.'' असे म्हणून ठेंगुरावाने अद्भुत वाटाण्याची शेंग मणीच्या हातावर ठेवली.

इतक्यात पहाटेच्या कोंबडा आरवला. ठेंगुराव आणि त्याचा सावलीचा घोडा एकदम अदृश्य झाला. मणीला ते सारे खरेच वाटेना. आपण स्वप्नच पाहिले अशी त्याची खात्री झाली. पण मग ही वाटाण्याची शेंग ? ती तर अगदी खरीखुरी होती ! त्याच्या हातांत होती !

मग मणी थांबलाच नाही. तो त्वरेने गढीकडे निघाला. आनंदाने आता तो शीळ वाजवीत होता.

मणी निघाला तो थेट सरदाराच्या पुढ्यात जाऊन उभा राहिला. सरदाराने विचारले, ''कोण रे तू?''

''मी लोहाराचा मुलगा-मणी''

''तुच तो लोहाराचा मुलगा काय ? चालता हो इथून. मला तुझं तोंड पाहायचं नाही.''

''मलासुद्धा फक्त जास्वंदीलाच पाहायचं आहे.'

''कां ? जास्वंदीला कशाला पाहायचं आहे? चेटूक करून तिचं कुत्रं केलंस आणि वर तिला पाहायला येतो आहेस!''

''महाराज माफ करा, आपण काय बोलतो ते माझ्या लक्षात येत नाही.''

''कशाला उगाच संभाविताचा आव आणतोस? इथं येऊन माझ्या दुःखावर डागण्या कशाला देतोस.

तुझ्यामुळंच झालं हे सगळं. चालता हो इथून."

"महाराज, मी इथून चालता झालो तर जास्वंदी कधीच बरी होणार नाही."

"म्हणजे ?"

"म्हणजे मी जास्वंदीसाठी खास औषध घेऊन आलो आहे."

"खास औषध ? कुठं आहे ते ?"

"महाराज, ते औषध मीच जास्वंदीला देईन. पण त्या अगोदर जास्वंदी मला देण्याचं वचन तुम्ही मला दिलं पाहिजे."

"वा. अगदी सौदा करतोस जास्वंदीचा. कुठला भिकारडा लोहाराचा पोर आणि म्हणे जास्वंदी पाहिजे. एक हजार मोहोरा देईन मी तुला."

"महाराज, त्या मोहोरा ठेवा आपल्यापाशीच. निघतो आता, एक गोष्ट मात्र लक्षात ठेवा: जास्वंदीच्या घोर अनर्थाला तुम्ही कारण आहात. तुमच्या हट्टामुळे जास्वंदीला कुत्रं होऊन राहावं लागलं." असे म्हणून मणी मागे फिरला.

पण तो दारापर्यंत पोहोचलाच नाही. सरदाराने धावत येऊन त्याला अडवले. त्याला जास्वंदी देण्याचें वचन दिले. आणि जास्वंदीला औषध देऊन बरे करण्याची याचना केली.

मणी जास्वंदीच्या दालनात शिरताच त्या कुत्र्याने प्रेमाने एकदम त्याच्या हातांत उडी मारली. मणीने अद्‌भुत वाटाणे खाऊ घालताच त्या कुत्र्याला जास्वंदीचे पूर्व रूप प्राप्त झाले !

मणीच्या आणि जास्वंदीच्या लग्नाला ठेंगुराव आला होता, पण तो त्या दोघांनाच दिसला, बाकी कोणालाच तो दिसला नाही !.



# झिपऱ्या आणि जलपऱ्या

आमच्या गावात घडलेली गोष्ट आहे ही. आमचे गाव लहानसेच होते. गावाजवळूनच एक नदी वाहत होती. त्या नदीत सुंदर जलपऱ्या राहतात, असा आम्हा गावकऱ्यांचा विश्वास होता. मात्र कुणीही कधी एखादी जलपरी प्रत्यक्ष पाहिली नव्हती. पण म्हणून काय झाले ? तसाच विश्वास ठेवायला कुणाची हरकत होती ?

गावात एक झिपऱ्या नावाचा दहा-बारा वर्षांचा मुलगा राहात होता. मुलगा मोठा चुणचुणीत होता. कुणी काहीही काम सांगितले तरी ते करायला एका पायावर तयार. गप्पा तर असा झोकायचा की मोठी मोठी माणसेसुद्धा आ वासून पाहात राहात; मग बायका-पोरांची काय कथा? मात्र झिपऱ्या नावाच्या या अप्रतिम मुलात एक दोष होता. त्याला अभ्यासाचा भारी कंटाळा यायचा. शाळा म्हणजे एक तुरुंग आहे आणि लांब लांब मिश्यांचे, मारकुटे मास्तर म्हणजे पहारेकरी आहेत असे त्याचे प्रामाणिक मत होते. त्यामुळे शाळेत न जाता, कुठे झाडावरच्या चिंचा-कैऱ्या काढ, कुठे अरण्यात पक्ष्यांची घरटी हुसकायला जा, कुठे नदीत डुंबायला जा अशा काही ना काही उचापती करण्यात तो दंग असायचा.

एकदा तर झिपऱ्याने कमालच केली. त्याने त्या मारकुट्या मास्तरांचीच खोडी काढली, आणि मास्तर मारायला धावले तशी त्यांच्या हातांवर तुरी देऊन तो पशार झाला. झिपऱ्या पसार झाला खरा; पण मग त्याला मास्तरांची भीती वाटू लागली. मास्तरांच्या हाती सापडलो तर मास्तर आपली चांगली कणीक तिबणार अशी त्याची पक्की खात्री झाली. त्यामुळे आपण लपून बसावे, असा विचार त्याने केला.

नदीचे पात्र कुठेकुठे उथळ होते. अशा एका उथळ भागात नदीच्या तटातच एक खोल खबदाड तयार झाले होते. हा भाग गावापासून दूर होता. झिपऱ्या जो उठला तो सरळ या खबदाडात जाऊन दडला.

तासामागून तास लोटले. झिपऱ्याला भलतील भूक लागली, पण तिथे त्या खबदाडीत खाणार काय ? घरच्यासारखे दाणे - खोबऱ्याचे डबे थोडेच होते तिथे ? सरतेशेवटी भुकेने झिपऱ्याला ग्लानी आली. तो गाढ झोपी गेला. तो किती वेळ झोपला कुणास ठाऊक.

कसल्याशा आवाजाने झिपऱ्या जागा झाला. कुणीतरी त्या खबदाडीत वावरत होते. प्रथम त्याला वाटले उंदिरबिंदीर असेल, असू द्या. आपल्यासारखा तोही आला असेल या खबदाडीत. पण त्याने नीट निरखून पाहिले. चक्क दोन माणसे वावरत होती तिथे. 'माणसे' असे म्हटले खरे पण त्यांची उंची झिपऱ्याच्या गुडघ्याएवढी होती. त्यांचा पोशाख, टोपी, चढाव सारे शेवाळी हिरव्या रंगाचे होते, आणि त्यांच्या कमरेला पेन्सिलीएवढी एकएक तलवार लटकवली होती. ती माणसे परीराज्यातली असली पाहिजेत हे न समजण्याइतका काही झिपऱ्या बावळट नव्हता. उलट त्यानेच तर पऱ्यांच्या राज्यातील अनेक गमतीजमती स्वत:च्या सुपीक कल्पनेने बनवून गावकऱ्यांना सांगितल्या होत्या. परंतु पऱ्यांच्या राज्यातील माणसांशी आपली साक्षात गाठ पडेल असे मात्र झिपऱ्याला कधी वाटले नव्हते.

तितक्यात त्याला जांभई आली. तिचा आवाज त्या खबदाडीच्या पोकळीत घुमला. ती माणसे चमकली आणि झिपऱ्यापाशी आली. आपल्या तलवारी त्यांनी झिपऱ्याच्या छातीवर रोखल्या होत्या. त्यातल्या एकाने झिपऱ्याला काहीतरी विचारले, पण झिपऱ्याला काही ऐकूच आले काही. मग झिपऱ्याने खुणेने त्याला कानात बोलायला सांगितले. झिपऱ्याच्या कानाजवळ तोंड नेऊन त्याने पुन्हा विचारले (तेव्हा झिपऱ्याला ऐकू आले.)

"कोणरे तू ? आणि नाव काय तुझं ?"

"मी झिपऱ्या. या वरच्या गावात राहतो मी" असे म्हणून झिपऱ्याने गावाच्या दिशेने हात केला. तो त्या सरदाराला लागला आणि तो सरदार जमिनदोस्त झाला.

झिपऱ्याला वाटले आता आपली शंभर वर्षे गरली, पण तरीही त्याला हसू आलेच. आश्चर्याची गोष्ट अशी की, ते सरदारदेखील मुळीच चिडले नाहीत. झिपऱ्याबरोबर तेही पोट धरधरून हसल लागले.

झिपऱ्याला धीर आला, आणि त्याने त्यांना 'तुम्ही कोण ?' असा प्रश्न विचारला. मात्र या प्रश्नाचे उत्तर देण्यापूर्वी त्यांनी झिपऱ्याला त्याची सगळी अगदी तो त्या खबदाडात कसा आला येथपर्यंतची — हकीकत सांगायला लावली. झिपऱ्या भुकेला आहे हे समजताच त्यांनी त्याच्यापुढे नाना प्रकारची फळे आणि दुधाने भरलेले पेले ठेवले. त्या फळात कलिंगडे होती ती लिंबाएवढी आणि आंबे होते ते बोराएवढे आणि दुधाचे पेले होते शाईच्या लहान दौतीएवढे. बरीचशी बरीचशी फळे फस्त करून वर वीस - पंचवीस पेले दूध प्याल्यावर झिपऱ्याला हुशारी वाटल लागली, आणि तो त्यांची हकीकत नीट मन लावून ऐकू लागला.

ते जलपरीचे प्रमुख सरदार होते. आज अनेक दिवसांनी ते पाण्याबाहेर आले होते. एक तर थोडा सूर्यप्रकाश वेचून पाण्यात न्यायचा होता, आणि दुसरे म्हणजे-दुसरे म्हणजे . . . ही दुसरी कामगिरी कोणती ते सांगतांना ते सरदार अडखळले. झिपऱ्याला त्याचे कारण कळेना. मग पुष्कळ विचार करून त्यांनी त्या दुसऱ्या

कामगिरीबद्दल थोडेसे सांगितले. ते झिपऱ्यासारख्या मुलाच्याच शोधात होते आणि झिपऱ्या अनायासेच त्यांना भेटला होता!

झिपऱ्या आश्चर्याने थक्क होऊन त्यांच्या तोंडाकडे पाहातच राहिला. आपल्या शोधात हे पऱ्यांच्या राज्यातील सरदार का असावेत हे त्याला स्वत:ला विचार करकरूनदेखील समजेना आणि ते सरदारसुद्धा काहीच सांगायला तयार होईनात. त्यामुळे त्या सरदारांनी "पऱ्यांच्या राज्यात येतोस ना?" असे त्याला विचारले तेव्हा त्या प्रश्नाचे उत्तर काय द्यावे हाच त्याच्यापुढे प्रश्न पडला. सरतेशेवटी, काय वाटेल ते होवो, जाऊ या तर खर असे ठरवून त्याने होकार दिला.

मग त्या सरदारांनी झिपऱ्याचे डोळे बांधले, आणि ते तिघे त्या खबदाडीतून बाहेर पडले. सुरुवातीला कितीतरी वेळ ते दगडगोटे तुडवीत चालले होते. मग झिपऱ्याच्या पावलांना पाणी लागले. आणखी पुढे गेल्यावर पाणी गुडघ्याशी आले. गुडघ्याएवढ्या त्या सरदारांचे काय झाले असेल, पाणी त्यांच्या डोक्यावरून गेले असेल की काय, याचा विचार झिपऱ्या करी असतानाच त्याच्या डोळ्यांवर बांधलेला रुमाल त्या सरदारानी काढून टाकला.

झिपऱ्या पाहू लागला. गुडघ्याएवढ्या पाण्यात तो उभा होता आणि त्याच्या दोन्ही बाजूंना ते सरदार पाण्याच्या पृष्ठभागावर, झिपऱ्या जसा जमिनीवर उभा राहिला असता तसे उभे होते.

इतक्यात त्यातल्या एकाने आपल्या खांद्यावरच्या पिशवीतून शेवाळी हिरव्या रंगाचे चढाव काढले आणि झिपऱ्याला ते पायात चढवायला सांगितले. ते चढाव झिपऱ्याच्या पायांना अगदी ठीक बसले; पण आश्चर्याची गोष्ट अशी की, ते चढाव घातल्याबरोबर झिपऱ्यादेखील पाण्यावर झकास उभा राहिला. मग त्या सरदाराने आपल्या तलवारीने पाण्यावर तीन वर्तुळे काढली आणि काय होते आहे हे समजायच्या आत त्यातील एका वर्तुळात झिपऱ्याचे पाय ओढले गेले. झिपऱ्या पाण्यात खोल खोल खोल झाऊ लागला. वास्तविक नदीचा तळ काढायची झिपऱ्याला सवय होती. पण हे काही भलतेच होते. झिपऱ्याचा मुळी स्वत:च्या शरीरावर ताबाच राहिला नव्हता.

मग एकदम तो थांबला. त्याच्या बाजूला ते दोन सरदार उभे होते, आणि समोर एका अजस्र शिंपलीचा दरवाजा होता. अभावितपणे त्याने आपले कपडे चाचपून पाहिले. सगळे कसे नीट कोरडे होते. तो स्वत:शीच पुटपुटला 'कमाल आहे!'

दरवाज्याबाहेर असलेल्या एका कासवाच्या पाठीवर एक शंख होता. एका सरदाराने तो शंख तीनदा फुंकला. दरवाजा उघडला गेला. झिपऱ्या आणि ते दोन सरदार आत गेले. झिपऱ्या खरोखरच पऱ्यांच्या राज्यात आला होता. जिकडे तिकडे लख्ख चंद्रप्रकाशासारखा प्रकाश पसरला होता. पऱ्यांच्या राज्यातील प्रजाजनांची वर्दळ चालू होती. मधूनच एखादा सरदार ससाएवढ्या घोड्यावर बसून दिमाखात मिरवत

जाई. भिरभिर डोळ्यांनी झिपऱ्या सगळीकडे पाहात होता, आणि ते दोन सरदार त्याच्याकडे पाहात गालातल्या गालात हसत होते.

थोडक्याच वेळात झिपऱ्याला दरबारात दाखल करण्यात आले. जलपऱ्यांची राणी पाचूंच्या सिंहासनावर विराजमान झाली होती. सिंहासनाच्या दोन्ही बाजूना शेवाळी हिरव्या रंगाचे पोशाख केलेले सरदार दरकदार आपापल्या योग्यतेप्रमाणे स्थानापन्न झाले होते.

झिपऱ्या आश्चर्यचकित होऊन पाहात राहिला. इतक्यात कोणीतरी शंख फुंकला आणि झिपऱ्याचे नाव उच्चारले. झिपऱ्या भानावर आला. दरबारी रितिरिवाजांची ऐतिहासिक नाटक-कादंबऱ्यांमुळे झिपऱ्याला चांगली माहिती होती. त्याने राणीला तीनतीनदा लवून मुजरा केला. ती मात्र मंद हसत होती. झिपऱ्या मनात म्हणाला: "कमालच आहे या राणीची! राजेराण्यांनी कसं गंभीर असलं पाहिजे आणि ही तर खुशाल हसते आहे?"

झिपऱ्याचे विचार राणीला कळले की नकळे. ती त्याला म्हणाली, "झिपऱ्या, मी राणी असले तरी तुला घाबरण्याचं मुळीच कारण नाही. शिवाय तू तर आमचा खास पाहुणा आहेस."

"बाईसाहेब माझ्यासारख्या सेवकावर आपण असा अनुग्रह जो केलात त्याबद्दल हा सेवक आपला अत्यंत आभारी आहे. परंतु या अनपेक्षित अनुग्रहाचे कारण काय असावे, ते विचार करूनदेखील या सेवकाच्या ध्यानात येत नाही." कोठल्या तरी ऐतिहासिक नाटकातले हे वाक्य भाकरीचा दगड पाण्यावर फेकावा तसे, झिपऱ्याने त्या दरबारात फेकून दिले.

सारा दरबार लवंगी फटक्याची माळ फुटावी तसा हसू लागला. दरबारी जनांचे हसणे विरल्यावर राणीसाहेब म्हणाल्या, "झिपऱ्या, तुला इथं आणलं कारण आम्हाला तुझी मदत पाहिजे आहे."

"पऱ्यांच्या राणीला माझ्यासारख्या य:कश्चित मुलाची मदत पाहिजे? म्हणजे पावसाला मडक्यातल्या पाण्याची तहान लागावी, तसलाच प्रकार." झिपऱ्याने अभिनयपूर्वक उत्तर दिले.

"होय झिपऱ्या, मला तुझी आणि फक्त तुझीच मदत पाहिजे" राणीसाहेब म्हणाल्या, "माझी लाडकी मुलगी परवाच्या दिवशी पाण्याबाहेर जमिनीवर फेरफटका करायला गेली होती. इतक्यात मोठा वारा आला आणि त्याबरोबर पालापाचोळा व धूळ उडू लागली. त्यातल्या धूळीचा एक कण राजकन्येच्या डोळ्यात गेला. झाले तिला डोळा उघडता येईना. आमच्या पऱ्यांच्या राज्यातले सगळे वैद्य, हकीम, मांत्रिक झाले, पण काही उपाय चालेना. शेवटी एका अगदी वृद्ध मांत्रिकाने सांगितले की, एखाद्या मुलाने राजकन्येच्या डोळ्यात फुंकर मारली तरच तिचा डोळा बरा होईल. हे ऐकून आम्ही ताबडतोब आमच्या प्रमुख सरदारांना या कामगिरीवर पाठवलं. त्यांनी ती कामगिरी कशी पार पाडली ते तुला माहीतच आहे."

झिपऱ्या भांबावून गेला. आपल्यामुळे पऱ्यांच्या राजकन्येचा डोळा बरा होणार, ही कल्पना झिपऱ्याला

फार आवडली हे खरे. तरी पण हे फारच झाले, असेही त्याला वाटले.

इतक्यात ती राजकन्याच सिंहासनाजवळ उभी असलेली त्याला दिसली. आपल्या इवल्याशा मुठींनी ती डोळे चोळत होती. झिपऱ्या तत्परतेने पुढे सरसावला आणि राजकन्येला काही सांगू लागला, पण गुडघ्याएवढ्या राजकन्येला उभे राहून काही सांगणे अशक्य आहे हे लक्ष्यात येताच त्याने तिच्यासमोर बैठक मारली आणि तो तिची समजूत घालू लागला. "उगी उगी रडू नको हं. आणि डोळे नाही हं चोळायचे मुठीने. जास्त लाल होतील ते. तू शहाणी ना ? मग ऐकणार नाही का तू माझं ?"

पण राजकन्या कुठली ऐकायला त्याचे! ती तर ताडमाड झिपऱ्याला पाहून अधिकच घाबरली आणि त्यामळे अधिक, मोठ्याने रडू लागली. अधिक जोरजोराने डोळे चोळू लागली.

झिपऱ्याला काय करावे सुचेना. त्याला स्वत:चाच राग आला. तो मनात म्हणाला, "हॅऽ एवढीशी चिमुरडी राजकन्या आणि मला झिपऱ्याला तिची समजूत काढता येईना ?"

वास्तविक झिपऱ्याने आजवर फक्त खोड्याच काढल्या होत्या; समजूत काढण्याची त्याला जरुरीच भासली नव्हती कधी. पण म्हणून काय झाले ? समजूत काढणे ही इतकी कठीण गोष्ट होती काय की तिच्यामुळे या चिमुरड्या राजकन्येने झिपऱ्याचा पराभव करावा ?

झिपऱ्याने पुन्हा एकदा प्रयत्न करायचे ठरवले. त्याच्या अंगात आता गप्पा झोकणाऱ्या झिपऱ्याचा संचार झाला होता. त्याने राजकन्येला गोष्टच सांगायला सुरुवात केली. तो म्हणाला, "ए, मी तुला गोष्ट सांगतो छान. पण रडायचं नाही हं. एक होती जलपऱ्यांची राजकन्या. तिला एकदा खूप कंटाळा आला. म्हणून ती गेली जमिनीवर फिरायला. इतक्यात तिकडून आला मोठा वारा त्याबरोबर धुळीचा एक कण फार घाबरला आणि पळत सुटला. त्याने विचार केला. या राजकन्येचा डोळा छान आहे लपायला. म्हणून तो हळूच डोळ्यात शिरला, आणि कोपऱ्यात लपून बसला . . ."

झिपऱ्याची गोष्ट राजकन्येला आवडली असावी. कारण ती डोळे चोळायचे थाबली आणि डोळ्यातून पाणी येत असतांनादेखील झिपऱ्याची गोष्ट नीट ऐकू लागली. अशी गोष्ट तिला कुणी कधी सांगितलीच नव्हती: वारा आला म्हणून धुळीचा कण घाबरला आणि पळत सुटला आणि मग माझ्या डोळ्यात लपून बसला! मी बागेत लपते ना तसा. वाऽफारच मज्जा. छान आहे हं ही गोष्ट.

झिपऱ्याची गोष्ट चालूच होती; "मग आला झिपऱ्या. त्याने राजकन्येच्या डोळ्यात जोरानं फुंकर मारली, आणि राजकन्या हसायला लागली." ही वाक्ये म्हणता म्हणताच झिपऱ्याने राजकन्येच्या डोळ्यात फुंकर मारली आणि त्याबरोबर कण निघाल्यामुळे खरोखरच राजकन्या हसायला लागली!

सगळे सरदार दरकदार आणि खुद्द राणी देखील हसू लागली!

राजकन्येच्या डोळ्यातला धुळीचा कण निघाला. राजकन्या पूर्वीसारखी हसू-खेळू लागली. हा चमत्कार

ज्याने केला त्या झिपऱ्यावर पऱ्यांच्या राणीचा लोभ जडला. झिपऱ्याने केलेल्या उपकारांची फेड करावी हा हेतू मनात ठेवून तिने झिपऱ्याला म्हटले, ''झिपऱ्या, तू मोठा चतुर मुलगा आहेस. तू फार मोठी कामगिरी बजावलीस, म्हणून परीराज्यातील रिवाजाप्रमाणे एक बक्षीस मी तुला देणार आहे. झिपऱ्या, तुझी कोणतीही एक इच्छा मी पुरी करीन. नीट विचार कर. कोणतीही एकच गोष्ट माग, आणि ती तुला मिळाली असं समज.''

झिपऱ्या विचार करू लागला. प्रथम त्याला वाटले, आपण कायम इथेच राहण्याची परवानगी मागावी. त्याचा हा विचार पऱ्यांच्या राणीला कसा कळला कुणास ठाऊक. ती म्हणाली, ''हं झिपऱ्या, तेवढं मात्र तुला मागता येणार नाही.''

झिपऱ्या मनात म्हणाला; ते बरंच झालं. नाहीतरी या गुढघ्या एवढ्या लोकात राहायचं म्हणजे पंचाईतच. आणि शिवाय चिंतू, गंप्या, बबन्या असले एकापेक्षा एक सवाई मित्र कुठे आहेत इथं ?

तो पुन्हा विचार करू लागला. पुष्कळ पैसे मागावे का राणीकडून ? पण नको. पैसे घेऊन आपण काय करणार ? . . . सुंदर सुंदर कपडे ? छे छे ! आहेत हेच मोठे मस्त आहेत. मग सारखे खायला देणारी जादूची थाळी ?

हां ही थाळीच मागावी, म्हणजे आपले येताजात झकास खाता येईल. . . . पण नको. कारण नेहमी तर तेच चाललेलं असतं आणि शिवाय ती थाळी सांभाळावी कुणी ?

झिपऱ्याचा विचार पक्का होईना. अनेक गोष्टी त्याने मागायच्या ठरवल्या आणि स्वतःच रद्द केल्या. मग एकदम त्याला मास्तरांची-त्या मारकुट्या मास्तरांची आठवण झाली. तशी त्याने चुटकी वाजवली. बस्. ठरला विचार. त्या मारकुट्या मास्तरनाच अद्दल घडवली पाहिजे चांगली. सगळ्यांना मारायला पाहिजे नाही का त्यांना ? आता चांगलीच फजिती करतो त्यांची.

विचार पक्का झाला तशी झिपऱ्या पऱ्यांच्या राणीला म्हणाला, ''राणीसरकार, मी पुष्कळ विचार केला, मला आपल्यापाशी एकच गोष्ट मागायची आहे. आमचे मारकुटे मास्तर श्रीयुत गणपत टिकोजी फाकडे हे आम्हाला फार मारतात. त्यांची छडी फार लागते. तरी ते आम्हांला पुन्हा कधीही मारणार नाहीत अशी व्यवस्था राणीसाहेबांनी करावी अशी माझी त्यांच्या चरणांशी प्रार्थना आहे !''

झिपऱ्याचे वाक्य संपले न संपले तोच राणीने 'तथास्तु' म्हटले.

झिपऱ्याला वाटले आपण पुन्हा एकदा विचारून त्याची खात्री करून घ्यावी. त्याने विचारले, ''पण हे अगदी खरं ना ? नाही तर . . .''

राणी म्हणाली, ''अगदी खरं, पण थांब, तू प्रत्यक्षच पाहा ना. म्हणजे पुन्हा शंका यायला नको.''

राणीने शंख फुंकला. झिपऱ्याच्या डोळ्यसमोर क्षणभर अंधार पसरला. त्याने डोळे उघडले तो त्याच्यासमोर

फाकडे मास्तर छडी परजीत उभे होते. राणी, राजकन्या, दरबार सारे एकदम गुप्त झाले होते.

ढगांच्या गडगडाटासारख्या आवाजात मास्तर बोलू लागले: "बरा सापडालस. माझ्या हातांवर तुरी देऊन पळाला होतास नाही का? मास्तरांची खोडी काढण्यापर्यंत मजल गेली काय तुझी! थांब तुला दाखवतोच आता या फाकड्याचा हिसका!"

मास्तर पुढे सरसावले. झिपऱ्याला वाटले. पऱ्यांच्या राणीचे देखील मास्तरांपुढे काही चाललेले दिसत नाही. तो मास्तरांच्या तोंडाकडे पाहू लागला.

मास्तर गरजले. "तोंडाकडे काय पाहतोस माझ्या? स्वत:चं थोबाड रंगवणारा नट नाही मी; मुलांची थोबाडं रंगवणारा मास्तर आहे मास्तर. 'फाकडे' म्हणतात मला. हात पुढं कर नीट."

झिपऱ्याने हात पुढे केला, आणि सपासप छड्या खाण्याची तयारी केली. मास्तरांनी हात उचलला. पण काय झाले कुणास ठाऊक. ते अचानक विव्हळायला लागले. झिपऱ्याला हसू फुटले. तो वरकरणी गंभीर होऊन मास्तरना म्हणाला, "काय झालं हो मास्तर?"

मास्तर अधिकच चवताळले. म्हणाले, "तुझं डोंबल. हातात एकदम लोखंडी गोळ्यासारखा गोळा आला बघ माझ्या. पण तू सुटलास असं समजू नकोस. पुन्हा घेईन समाचार तुझा"

"ते आता शक्य नाही मास्तर. पऱ्यांच्या राणीनं वचन दिलंय तसं मला" झिपऱ्या आता जायला पाहिजे तुला. पऱ्यांच्या राज्यात माणसांना फार काळ नाही राहता येत. तू आम्हाला केलेल्या मदतीबद्दल मी पुन्हा एकदा तुझे आभार मानते."

झिपऱ्याने साऱ्या दृश्यावर एकवार नजर फिरवली ते दृश्य नजरेत साठवून घेतले आणि पऱ्याच्या राणीला त्रिवार मुजरा करून तो निघाला.

इतक्यात राजकन्येने त्याला हाक मारली, "झिपऱ्याऽ" झिपऱ्या मागे वळला.

राजकन्या राणीला उद्देशून म्हणाली, "आई, या झिपऱ्याची एक इच्छा तू पुरवलीस हे छानच झालं, पण ज्यानं माझा डोळा बरा केला त्याला मी काहीच न देणं बरं दिसेल का? तसं झालं तर हा झिपऱ्या बाहेर जाऊन सांगेल: एवढा मी पऱ्यांच्या राज्यात गेलो, राजकन्येचा डोळा बरा केला; पण राजकन्या कसली कंजूष. तिनं काहीसुद्धा दिलं नाही मला."

"नाही हं, इतका काही 'हा' नाही मी" झिपऱ्या घाईघाईने म्हणाला.

पण राजकन्येने त्याचे म्हणणे ऐकलेच नाही. ती पुढे म्हणाली, "आई, मी झिपऱ्याला एक पाटीपेन्सिल देऊन टाकते, म्हणजे त्याला अभ्यासाची काळजीच करायला नको. कारण म्हणतातच मुळी की, "ज्याच्या हाती परीची पाटी, त्याला माहीत सगळ्या गोष्टी."

राणीने अर्थातच काही विरोध केला नाही. राजकन्येने स्वत: पुढे होऊन झिपऱ्याला पेन्सिल पाटी दिली आणि समस्त दरबारी मंडळीने झिपऱ्याचा एकमुखाने जयजयकार केला.

त्या जयजयकारात मिसळलेला काही गावकऱ्यांचा आवाज झिपऱ्याने ऐकला. जयजयकार विरला आणि गावकऱ्यांचा आवाज स्पष्टच ऐकू येऊ लागला. ते झिपऱ्याच्याच नावाने हाका मारीत होते.

झिपऱ्या वेड्यासारखा त्यांच्यकडे पाहात राहिला.

बराच वेळ बेपत्ता असलेला झिपऱ्या अखेर सापडला होता, पण तो अशा अवस्थेत सापडेल याची मात्र गावकऱ्यांना कल्पना नव्हती. झिपऱ्याच्या हातात पाटीपेन्सिल होती! दुसरी कोणतीही वस्तू झिपऱ्याच्या हातात शोभून दिसली असती. पण पाटीपेन्सिल म्हणजे फारच झाले. एखादी परी दिसती तर गावकऱ्यांना जेवढे आश्चर्य वाटले नसते तेवढे आशचर्य झिपऱ्याच्या हातातील पाटीपेन्सिल पाहून त्यांना वाटले.

इथे झिपऱ्याची गोष्ट जवळ जवळ संपलीच. आता फक्त एका प्रश्नाचे उत्तर द्यावयाचे आहे. ही झिपऱ्याची गोष्ट खरी की खोटी? हा प्रश्न जेव्हा अनेकजण मला विचारतात तेव्हा मी त्यांना सांगतो, की ते मला नीटसे माहीत नाही. मात्र त्यानंतर उनाडक्या सोडून झिपऱ्या अभ्यास करू लागला आणि मोठा हुशार विद्यार्थी झाला हे खरे, आणि छडी मारताना हातात गोळा येतो म्हणून छड्या मारणे मी सोडून दिले हेही खरे!

● ● ●